आदिवासी घटक कार्यक्रम-मुख्य लेखाशीर्ष २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा या अंतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम) या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता निधी वितरीत करण्याबाबत. (लेखाशीर्ष २२५१ ०८४८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र. २/कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ३१ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
३) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. MTD-४१०२१/७/२०२४-MTD-COMP-SEC ई-ऑफिस क्र.७४९७९३

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळाचे सहाय व देखभाल करण्याचे देयक अदा करण्याकरीता रु.५.७७३७८ लाख इतका निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.३ अन्वये वित्त विभागास सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-४ मध्ये मुख्य लेखाशीर्ष २२५१, सचिवालयीन-सामाजिक सेवा या अंतर्गत ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी या योजनेंतर्गत आदिवासी विकास विभागाच्या संकेतस्थळाचे सहाय व देखभाल करण्याचे देयक अदा करण्यासाठी खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| संगणक खर्च | २२५१ ०८४८ | ५०, इतर खर्च | १५०.०० | ५.७७३७८ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.५.७७३७८ लाख (अक्षरी रुपये पाच लाख सत्त्याहत्तर हजार तीनशे अठ्ठयाहत्तर फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. १ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांतील तरतुदींस अनुसरुन तसेच वित्त विभागाने प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४९१/२०२५/व्यय-१४, दि.३१.०३.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११४२०५८५९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.03.31 20:05:49 +05'30'

( राजेंद्र दे. भवारी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
३. सह सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, कार्या-रोखशाखा, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन-६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (निवडनस्ती).